**सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास सहायक अनुदान (योजनेतर) वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बियुडी २०१३/प्र.क्र.१४१/का-९**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ जानेवारी २०१५

**<u>संदर्भ :</u>**- (१) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.बियुडी २०१३/प्र.क्र. १४१/का-९, दि. २७.८.२०१४.
(२) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग, क्र.बियुडी २०१३/प्र.क्र. १४१/का-९, दि. २७.८.२०१४.
(३) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अंदाज २०१३/प्र.क्र. ८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दि.२ जानेवारी २०१५.
(४) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/२०१४ जा-२१०५, दि.२८.१०.२०१४

**<u>शासन निर्णय :-</u>**

संदर्भ क्रमांक (२) येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास “२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ - (योजनेतर)” या लेखाशीर्षांतर्गत माहे ऑगस्ट ते नोव्हेंबर २०१४ करिता ३६ सहायक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाखाली रु.१६.३६ लक्ष एवढे तर ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली रु.१०.६८ लक्ष /- एवढे अनुदान वितरित करण्यात आले होते. संदर्भ क्र. ४ वरील पत्रान्वये सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ न नोंदवता निर्गमित झाल्याचे निदर्शनास आणले. त्यानुसार सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याचे विचाराधिन होते.

२. संदर्भ क्र. (३) येथील शासन परिपत्रकान्वये अशा सूचना देण्यात आल्या आहेत की, सन २०१४-१५ या वर्षातील उर्वरित कालावधीसाठी आवश्यक असणारा योजनेतर व योजनांतर्गत अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ८० टक्के व ६० टक्केच्या मर्यादेपर्यत खर्च करण्यास अनुमती देण्यात आलेली आहे.

३. त्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाकरिता “मागणी क्र.झेडई - १, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ - (योजनेतर)” या लेखाशीर्षांतर्गत सन २०१४-१५ या चालू आर्थिक वर्षात ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर ) या उद्दीष्टाखाली रु.४०,००,०००/- एवढी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. यापैकी संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये आयोगास ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) या उद्दिष्टाखाली रु.१३.३२ लक्ष एवढे अनुदान वितरित करण्यात आले आहे. वित्त विभागाने संदर्भ क्र.३) येथील शासन परिपत्रकान्वये विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार महाराष्ट्र

राज्य अल्पसंख्याक आयोगास ३१ सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर या लेखाशीर्षसाठी रु. ४० लक्ष अनुदानाच्या ८० टक्के मर्यादेपर्यतचे उर्वरित रु. १८.६८ लक्ष एवढे अनुदान वितरित करण्यास व खर्च मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांना उपरोक्त योजनांसाठी उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या निधीसाठी ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सर्व जिल्हाधिकारी यांना वितरित करण्यात आलेल्या रकमेबाबत खर्चाचा तपशिल व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilaization Certificate) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने शासनास विहित कालावधीत सादर करावे. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग एक मधील अ.क्र. २७ नियम क्र. १४९ नुसार सर्व अटी व शर्तीचे पालन करुन प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आणि अपर मुख्य सचिव यांनी प्रशासनिक विभाग प्रमुख या नात्याने दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.११/१५//व्यय-४, दि.३.१.२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११२१४५१५३८४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995, postalCode=400032, st=Maharashtra, cn=GANGURDE SANJAY SURYAKANT
Date: 2015.01.12 15:00:44 +05'30'

**( सं.सु.गांगुर्डे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
६) अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
८) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,

९) पोलीस आयुक्त (सर्व)
१०) संचालक, लेखा व कोषागारे
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१३) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१४) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१५) सर्व मंत्रालयीन विभाग
१६) उप सचिव, वित्त विभाग (व्यय-४), अर्थ-१४ नियोजन विभाग (का-१४७५) मंत्रालय, मुंबई,
१७) निवडनस्ती (कार्यासन-९)